अनुसूचित जाती उपयोजना अंतर्गत अनुसूचित जाती / नवबौध्द शेतकऱ्यांना शेतीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः विघयो -१५१५/ प्र.क्र. ११५/ ४अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
तारीख: २३ जून, २०१५

वाचा

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. विघयो-१५१४/ प्र.क्र. ९७/४अे, दि. ०७ जुलै, २०१४, १२ सप्टेंबर, २०१४ व दि. १७ मार्च, २०१५
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे पत्र क्र. विघयो-२०१४ /प्र.क्र.६० /विघयो, दिनांक १२ मार्च, २०१५
३) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५
४) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. विप्र-७/विघयो/१५-१६ /अनु.वा./२४८/२०१५, दि. २१ मे, २०१५
५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. विघयो-१५१५/ प्र.क्र. ११५/४अे, दि. १२ जून, २०१५

प्रस्तावना

दारिद्रय रेषेखाली असणाऱ्या अनुसूचित जाती / नवबौध्द शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढवून त्यांना दारिद्रय रेषेवर आणण्यासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना कृषि विभागामार्फत विशेष घटक योजनेअंतर्गत १९८२ पासून राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत जमीन सुधारणा, निविष्ठा पुरवठा, पीक संरक्षण औजारे / शेतीची सुधारित औजारे, बैलगाडी, बैलजोडी/ रेडेजोडी, इनवेल बोअरिंग, जुनी विहिर दुरूस्ती, पाईपलाईन, पंपसेट, ताडपत्री, नविन विहिर इत्यादी बाबीवर अनुसूचित जाती/ नवबौध्द शेतकऱ्यांना अनुदान देण्यात येते. सन २०१४-१५ मध्ये सदर योजना राज्यात राबविण्यासाठी एकूण ₹ १७६३९.९२ लाख निधी संदर्भाधीन अ.क्र.१ येथील शासन निर्णयांन्वये वितरित करण्यात आला आहे.

सदर योजना सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने ₹ १९११८.६३ लाख ( अक्षरी रूपये एकशे एक्क्याण्णव कोटी, अठरा लाख,त्रेसष्ठ हजार फक्त ) नियतव्यय मंजूर झाल्याचे संदर्भाधीन अ.क्र. २ येथील पत्राने कळविले आहे. वित्त विभागाच्या दि. १७ एप्रिल, २०१५ च्या परिपत्रकान्वये एप्रिल ते नाव्हेंबर, या आठमाहीमध्ये खर्च करण्यासाठी परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून एकूण नियतव्ययाच्या ७० टक्के नियतव्यय वितरित करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार अनुसूचित जाती उपयोजना सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यासाठी ₹१९११८.६३ लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता व ७० टक्के मर्यादेत

₹१३३८३.०४ लाख निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता संदर्भाधीन अ.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आली होती. तथापि, सदर शासन निर्णयामध्ये काही बदल करणे आवश्यक असल्याचे विभागाच्या निदर्शनास आल्यामुळे, संदर्भाधीन अ.क्र.५ येथील दि. १२ जून, २०१५ अन्वये निर्गमित केलेला शासन निर्णय अधिक्रमित करून, अनुसूचित जाती उपयोजना सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यासाठी ₹१९११८.६३ लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता व ७० टक्के मर्यादेत ₹१३३८३.०४ लाख निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यासाठी नव्याने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

१) संदर्भाधीन अ.क्र. ५ येथील दि. १२ जून, २०१५ चा समक्रमांकाचा शासन निर्णय या शासन निर्णयान्वये "अधिक्रमित" करण्यात येत आहे.

२) अनुसूचित जाती/नवबौध्द शेतकऱ्यांचे शेतातील पिकांचे उत्पादन वाढवून त्यांच्या उत्पन्नात वाढ करण्यासाठी अनुसूचित जाती/नवबौध्द शेतकऱ्यांना शेतीसाठी अर्थसहाय्य देण्याची विशेष घटक योजना, सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यासाठी ₹१९११८.६३ लाख (अक्षरी रूपये एकशे एक्क्याण्णव कोटी, अठरा लाख, त्रेसष्ठ हजार फक्त) नियतव्ययाच्या कार्यक्रमास या आदेशान्वये शासनाची प्रशासकीय व एकूण नियतव्ययाच्या ७० टक्के मर्यादेत ₹१३३८३.०४ लाख (अक्षरी रूपये एकशे तेत्तीस कोटी, त्र्याऐंशी लाख, चार हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३) या योजनेअंतर्गत वितरित करण्यात येत असलेला ₹१३३८३.०४ लाख निधीचा खर्च सन २०१५-१६ करिता खालील लेखाशिर्षाअंतर्गत मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष:-**

मागणी क्र. - डी-३
२४०१- पीक संवर्धन
८०० इतर खर्च,
८०० (दोन) पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना
राज्य योजनेंतर्गत योजना, विशेष घटक योजना
(००) (०३) शेतकऱ्यांना दारिद्र्य रेषेच्यावर आणणेसाठी अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत अर्थसहाय्य
(२४०१ १११४), ३३- अर्थसहाय्य

४) या योजनेंतर्गत अनुसूचित/नवबौध्द शेतकऱ्यांना जमीन सुधारणा, निविष्ठा पुरवठा, पीक संरक्षण औजारे / शेतीची सुधारित औजारे, बैलगाडी, बैलजोडी/ रेडेजोडी, इनवेल बोअरिंग, जुनी विहिर दुरूस्ती, पाईपलाईन, पंपसेट, ताडपत्री, नविन विहिर इत्यादी घटकांचे वितरण करण्याचा परिशिष्ट ( एक) मधील घटकनिहाय कार्यक्रम व परिशिष्ट (दोन ) मधील जिल्हानिहाय कार्यक्रम, परिशिष्ट ( तीन ) मध्ये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे, उपरोक्त योजना राबविताना शासन निर्णयासोबत निर्गमित करण्यात येत असलेल्या परिशिष्ट ( चार ) मधील कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता संबंधित क्षेत्रिय कार्यालयांनी घ्यावी.

५) जे लाभार्थी नविन विहिर या घटकाचा लाभ घेणार आहेत, त्यांचे साठी प्रती लाभार्थी अनुदानाची कमाल मर्यादा ₹ ७०,०००/- ते ₹ १,००,०००/- राहील व जे लाभार्थी नविन विहिर या घटकाचा लाभ घेणार नाहीत, त्यांचेसाठी अनुदानाची कमाल मर्यादा ₹ ५०,०००/- ( रूपये पन्नास हजार फक्त ) राहील. नविन विहिर या घटकासाठी कमाल मर्यादा ₹ १,००,०००/- असली तरी विहिर खोदाईसाठी खर्च कमी झाल्यास खर्चाच्या मर्यादेइतकेच अनुदान देय राहिल.

६) सदर योजनेच्या अमंलबजावणीसाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी त्यात पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घ्यावी.

(i) प्रत्येक जिल्ह्याचा विस्तार व फलोत्पादन विकास आराखडा तयार करण्यात येत आहे, त्यामध्ये या योजनेचा गरजेनुरूप अंतर्भाव करण्यात यावा.

(ii) या योजनेचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून ( Third Party Evaluation ) करून घ्यावे.

(iii) वैयक्तिक लाभार्थी निवडताना महिला लाभार्थींना प्राधान्य देण्यात यावे.

(iv) स्वर्गीय कर्मवीर दादासाहेब गायकवाड स्वाभिमान व सबळीकरण योजनेंतर्गत सामाजिक न्याय विभागामार्फत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांना ४ एकर जिरायत अथवा २ एकर बागायती जमिनीचे वाटप करण्यात येत आहे. सदर लाभार्थ्यांना अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत प्राधान्याने लाभ देण्यात यावा.

(vi) या योजनेंतर्गत घेतलेल्या कार्यक्रमाची व लाभार्थ्यांची यादी जिल्हा परिषद, पंचायत समिती, जिल्हाधिकारी, तहसिल व जिल्हा समाज कल्याण अधिकारी कार्यालयात लावण्यात यावी, तसेच इंटरनेटवर उपलब्ध करून देण्यात यावी.

७) उपरोक्त योजना, सन २०१५-१६ या वर्षामध्ये राबविण्यास ₹१९११८.६३ लाख खर्चाच्या कार्यक्रमासाठी कृषि संचालक ( विस्तार व प्रशिक्षण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व आयुक्तालय स्तरावर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय,

महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, या निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनार्थ विभागीय कृषी सहसंचालक स्तरावर विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत होईल याची दक्षता कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी.

८) सदर योजनेंतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी योजनेच्या अटी व शर्तींच्या अधीन राहून खर्च होईल व त्याबाबतचा सविस्तर अहवाल शासनाला विहित मुदतीत सादर केला जाईल याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे, सदर योजनेअंतर्गत लाभ देण्यात आलेल्या लाभार्थ्यांचा फलनिष्पती अहवाल प्रत्येक जिल्ह्याकडून प्राप्त करून त्यांचे कृषी आयुक्तालय स्तरावर संकलन करावे. प्रत्येक आर्थिक वर्षामध्ये निधी वितरणाच्या प्रस्तावासोबत सदर फलनिष्पती अहवाल शासनास सादर करावा. सदर योजना राबविताना गरजू लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येत आहे, याबाबत खातरजमा करावी.

९) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक **अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५** मधील परिशिष्टातील विषयसूचीतील अटींच्या पालनतेच्या अधीन राहून व मा. अपर मुख्य सचिव (कृषी व पणन) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२३१३०१५५३६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2015.06.23 13:06:09 +05'30'

**(सु.सं.धपाटे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य यांना महाराष्ट्र विधानमंडळ द्वारा
४. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे (१० प्रतीसह)

५. संचालक, समाज कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
८. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती ( सर्व )
९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१०. सर्व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१२. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाबीज अकोला
१४. सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१५. विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी, सर्व जिल्हे
१६. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व )
१७. महालेखापाल महाराष्ट्र ( लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
१८. महालेखापाल महाराष्ट्र ( लेखा परिक्षा ) मुंबई / नागपूर
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०. सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ ( कार्यासन विघयो -१ )
२१. ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२२. सहसंचालक ( विघयो ) कार्यालय संचालक, समाज कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- १
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२४. वित्त विभाग व्यय-१ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई
२५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२६. सर्व उप सचिव/ अवर सचिव / कार्यासन अधिकारी ( फक्त कृषि ), कृषि व पदुम विभाग
२७. मा. मंत्री ( कृषि ), यांचे खाजगी सचिव
२८. मा. राज्यमंत्री ( कृषि ), यांचे खाजगी सचिव
२९. निवड नस्ती (४अे)

शासन निर्णय क्र. विघयो - १५१५/प्र. क्र. ११५/४ अे, दि. २३ जून, २०१५ चे

परिशिष्ट (एक)

अनुसूचित जाती उपयोजने अंतर्गत अनुसूचित जाती / नवबौध्द शेतकऱ्यांना कृषि विकासासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २०१५-१६ मध्ये राबविण्याकरिता खालीलप्रमाणे अनुदान देय राहील.

| अ.क्र. | बाब | अनुदानाची टक्केवारी | अनुदानाची मर्यादा ( रूपये ) |
|---|---|---|---|
| १ | जमीन सुधारणा ( १ हेक्टर मर्यादेत ) | १०० | मृद संधारण निकषानुसार ₹ ४०,०००/- |
| २ | प्रात्यक्षिकासाठी निविष्ठा वाटप (१ हेक्टर मर्यादेत ) | १०० | ₹ ५,०००/- च्या मर्यादेत |
| ३ | पीक संरक्षण / शेतीची सुधारित अवजारे | १०० | ₹ १०,०००/- च्या मर्यादेत |
| ४ | बैलजोडी / रेडेजोडी (स्थानिक बाजार भावानुसार ) | १०० | ₹ ३०,०००/- च्या मर्यादेत |
| ५ | बैलगाडी | १०० | ₹ १५,००० /- च्या मर्यादेत |
| ६ | जुनी विहिर दुरुस्ती | १०० | ₹ ३०,०००/- च्या मर्यादेत |
| ७ | इनवेल बोअरिंग | १०० | ₹ २०,०००/- च्या मर्यादेत नाबार्डच्या निकषानुसार |
| ८ | पाइप लाइन | १०० | ₹ २०,०००/- च्या मर्यादेत ३०० मीटरपर्यंत नाबार्डच्या निकषानुसार |
| ९ | पंपसंच | १०० | ₹ २०,०००/- च्या मर्यादेत |
| १० | नवीन विहिर | १०० | ₹ ७०,०००/- ते ₹ १,००,०००/- च्या मर्यादेत |
| ११ | शेततळे | १०० | ₹ ३५,०००/- मृ .सं .निकषानुसार |
| १२ | परसबाग कार्यक्रम (फलोत्पादन विभागाच्या निकषानुसार ) | १०० | ₹ २००/- प्रती लाभार्थी |
| १३ | तुषार / ठिबक सिचन संच पुरवठा | १०० | . ₹ २५,०००/-प्रती हेक्टरच्या मर्यादेत |
| १४ | ताडपत्री | १०० | ₹ १०,०००/- प्रती लाभार्थीच्या मर्यादेत |

शासन निर्णय क्र. विघयो - १५१५/प्र. क्र. ११५/४ अे, दि. २३ जून, २०१५ चे

परिशिष्ट (दोन )

अनुसूचित जाती उपयोजने अंतर्गत अनुसूचित जाती / नवबौध्द शेतकऱ्यांना कृषि विकासासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २०१५-१६ अंतर्गत जिल्हानिहाय वितरण विवरणपत्र

(रूपये लाखात)

| अ.क्र | जिल्हा | निधी | अ.क्र. | जिल्हा | निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | ३०.०० | २६ | गडचिरोली | २७०.०१ |
| २ | पालघर | १०.०० | २७ | औरंगाबाद | १५००.०० |
| ३ | रायगड | १४४.०० | २८ | जालना | ६६०.०० |
| ४ | रत्नागिरी | १७५.०० | २९ | बीड | ६७८.२६ |
| ५ | सिंधुदुर्ग | ७९.८२ | ३० | परभणी | ९००.०० |
| ६ | नाशिक | २८०.०० | ३१ | हिंगोली | ४४०.०० |
| ७ | धुळे | २०१.२१ | ३२ | नांदेड | २४२०.०० |
| ८ | नंदूरबार | ६०.०० | ३३ | उस्मानाबाद | ३१४.०० |
| ९ | जळगांव | ४१५.०० | ३४ | लातूर | ५००.०० |
| १० | अहमदनगर | ६०५.०० | | | |
| ११ | पुणे | ३००.०० | | | |
| १२ | सातारा | ३६३.०० | | | |
| १३ | सांगली | ४५०.०० | | | |
| १४ | सोलापूर | १०२४.४३ | | | |
| १५ | कोल्हापूर | ६००.०० | | | |
| १६ | बुलढाणा | ११२६.५१ | | | |
| १७ | अकोला | ५५०.०० | | | |
| १८ | वाशिम | ८००.०० | | | |
| १९ | अमरावती | १०४५.०० | | | |
| २० | यवतमाळ | ६८३.३३ | | | |
| २१ | नागपूर | ४८४.०० | | | |
| २२ | वर्धा | ५४४.५० | | | |
| २३ | भंडारा | ३००.०० | | | |
| २४ | गोंदिया | ४००.०० | | | |
| २५ | चंद्रपूर | ७६५.५६ | | | |

**शासन निर्णय क्र. विघयो - १५१५/प्र. क्र. ११५/४अे, दि. २३ जून, २०१५ चे परिशिष्ट - (तीन)**
**अनुसूचित जाती उपयोजने अंतर्गत अनुसूचित जाती / नवबौध्द शेतक-यांना**
**कृषि विकासासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना**

१. **जमीन सुधारणा :**

जमीन सुधारणा करण्यासाठी रु. ४०,००० /- च्या मर्यादेत १ हेक्टर पर्यत १००टक्के अनुदान किंवा ग्राम विकास व जल संधारण विभागाने निश्चित केलेल्या निकषानुसार १०० टक्के अनुदान देय राहील. सदर घटकांचे निकषांमध्ये वेळोवेळी केले जाणारे बदलही लागू राहतील. या बाबी अंतर्गत नवीन भातखाचरे, मजगी या बाबींचा लाभ देण्यात यावा.

**जमीन सुधारणा या बाबींसाठी ₹ ४०,०००/- पेक्षा जादा येणारा खर्च लाभार्थीने स्वत: सोसावयाचा आहे.**

२. **निविष्ठा पुरवठा**

निविष्ठा पुरवठा करण्यासाठी रक्कम ₹ ५०००/- पर्यत १०० टक्के अनुदान उपलब्ध राहील. या बाबींमध्ये शेतक-यांना फक्त बियाणे, खते व पीक संरक्षण औषधी यांचा पुरवठा करण्यात यावा. बियाणे पुरवठयासाठी सहकारी संस्था, महाराष्ट्र बियाणे महामंडळाच्या स्थानिक कार्यालयात मागणी नोंदवावी. खते व पीक संरक्षण औषधांकरीता सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळाच्या कार्यालयाकडे मागणी नोंदवावी. तसेच तालुका बीज गुणन केंद्र, कृषि विद्यापीठे, शासकीय जैव नियंत्रण प्रयोग शाळा यांचेकडे किड व्यवस्थापन बाबतची मागणी नोंदवावी. निविष्ठांचा पुरवठा हंगामापुर्वी वेळेत करणेत यावा. निविष्ठा पुरवठा हा एक हेक्टर क्षेत्राच्या मर्यादेत करण्यांत यावा. या घटकाचा लाभ खरीप / रब्बी व उन्हाळी या तिन्ही हंगामात अथवा एकाच हंगामात देता येईल, मात्र या बाबी करीता कमाल मर्यादेपेक्षा अधिकचे अनुदान देय राहणार नाही. एकात्मिक किड व्यवस्थापनाव्दारे पीकावरील किडीचा प्रादुर्भाव सूचना कृषि विभागाव्दारे देण्यात आलेल्या आहेत. तसेच या करीता आवश्यक मित्र किडी व परोपजीवी किटकांचे कार्डस विविध संस्थेव्दारे तसेच प्रयोगशाळांव्दारे निर्मिती करण्याचे सुरु करण्यात आले आहे. याचे खरेदी संदर्भात कृषि संचालक (गुणवत्ता नियंत्रण) यांनी दिलेल्या सुचनेनुसार खरेदी करण्यात यावी. एकात्मिक किड व्यवस्थापनामध्ये ट्रायकोडर्मा, ट्रायकोगामा, एनपीव्ही **(Nuclear polyhydrosis Virus)** व निमपेस्टीसाईड यांचा सुध्दा अंतर्भाव करण्यात आलेला आहे. निविष्ठांचा पुरवठा करताना भौगोलिक परिस्थितीचा अभ्यास करुन त्या भागात होणा-या प्रचलीत पिकांच्या बियाण्याचे संकरीत / सुधारित/ अधिक उत्पादन देणारे वाण यांचा पुरवठा करावयाचा आहे.

३. **शेतीची सुधारित अवजारे :-** या बाबी अंतर्गत शेतीची सुधारित अवजारे / पीक संरक्षणांची धुरळणी/ फवारणी यंत्रे यांचा लाभ रक्कम ₹ १०,०००/- पर्यत १०० टक्के अनुदानावर द्यावयाचा आहे. ज्या भागामध्ये जी शेतीची अवजारे प्रचलित असतील व अशा अवजारांना जिल्हास्तरावरील समितीने मान्यता दिलेली असेल अशा अवजारांचा पुरवठा शेतक-यांच्या मागणीनुसार करता येईल. अनुदानाच्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून शासनाने दरनिश्चिती करून मंजूरी दिलेली औजारे देय राहतील. कृषि

विभागाच्या अन्य योजनामधून पीक संरक्षण औजारे या बाबीकरिता काही प्रमाणात अनुदानाची तरतूद आहे. करिता विविध योजनांच्या माध्यमातून गरजू शेतकऱ्यांना या बाबीवर लाभ देताना शेतक-याची गरज व निकड यांचा विचार करणे गरजेचे आहे. प्रती हेक्टरी पीक निहाय आवश्यक सापळ्याची माहिती व त्याकरिता आवश्यक असलेल्या कॅप्सुल बाबतचा तपशिल संबधीत कक्षा कडुन प्राप्त करुन घेणे गरजेचे राहील.

**४. <u>बैलजोडी/रेडेजोडी :-</u>**

बैलजोडी / रेडेजोडी करिता ₹ ३०,०००/- मर्यादेत १०० टक्के अनुदान उपलब्ध राहील. बैलजोडी / रेडेजोडी यांचा पुरवठा लाभार्थ्याच्या गरजेनुरुप करावा. बैलजोडीची खरेदी नियमीत जनावरांच्या बाजारात लाभार्थ्याच्या संमतीनुसार, पशुवैद्यकीय अधिकारी, जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) जिल्हा परिषद व कृषि अधिकारी (विघयो) यांच्या उपस्थितीत करावी. बैलजोडी सुदृढ व शेती कामात योग्य असल्या बाबत पशुवैद्यकीय अधिका-यांकडून प्रमाणपत्र घेण्यात यावे. खरेदीचा व्यवहार झाल्यानंतर बैलजोडीचा विमा उतरविण्यांत यावा व निशाणी म्हणून टॅटूईग करुन (गोंदवून) घ्यावे. तसेच लाभार्थीचा बैलजोडी समवेत पोष्टकार्ड साईजचा फोटो काढावा व सदर फोटो संबंधित अधिकारी यांना तपासणीचे वेळेस उपलब्ध करुन द्यावेत. ज्या लाभार्थ्यांकडे सद्यस्थितीत बैलजोडी आहे अशा लाभार्थ्यांना बैलजोडी / रेडेजोडीचा लाभ देवू नये. **बैलजोडी घटकाचा लाभ घेतल्यानंतर पुढे त्याला किमान पाच वर्षापर्यत बैलजोडी घटकाचा लाभ घेता येणार नाही.**

**५. <u>बैल गाडी :-</u>**

बैलगाडी या घटकांसाठी जे निकष निर्धारित करण्यात आले, त्या निकषांच्या १०० टक्के अनुदान ₹ १५,०००/- च्या मर्यादेत उपलब्ध राहील.

बैलगाडीची खरेदी करताना स्थानिक परिस्थितीचा विचार करुन लाभार्थ्याच्या निवडी व निकडीनुसार स्थानिक बाजारातून बैलगाडीची खरेदी करता येईल. जिल्हास्तरीय औजार समितीचे मान्यतेने अशी खरेदी करताना जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) व कृषि अधिकारी (विघयो) यांच्या उपस्थितीत करण्यात येईल. सुधारित बैलगाडीची मागणी असल्यास बैलगाडीचा पुरवठा महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ यांचेमार्फत करण्यात यावा. मात्र अश्या बैलगाडीची किंमत जास्त असल्यास उर्वरीत रक्कम लाभार्थी स्वत:च्या गंगाजळीतून / कर्ज माध्यमाव्दारे उपलब्ध करु शकेल याची खात्री करण्यांत यावी. बैलगाडीचा पुरवठा केल्यानंतर बैलगाडीवर दर्शनी भागावर या योजनेचे नाव व पुरवठा केल्याचे वर्ष ३X२ इंच आकाराचे पत्र्याचे लेबल लावावे अथवा लाकुड असलेल्या भागात कोरण्यात यावे.

**६. जुनी <u>विहिर दुरुस्ती :-</u>**

या बाबी अंतर्गत नाबार्डने निर्धारित केलेल्या निकषांच्या आधारे १०० टक्के म्हणजेच ₹ ३०,०००/- अनुदान देय राहील. उर्वरीत रक्कम लाभार्थीने कर्जरुपाने अथवा स्वत: उभी करावयाची आहे. लाभार्थ्याकडे असलेल्या जुन्या विहिरीची कामे करताना अंदाजपत्रक तयार करुन उप अभियांत्याकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. कृषि अधिकारी (विघयो) पंचायत समिती यांनी झालेल्या कामाच्या

माजमापानुसार खर्चाचे प्रमाणात अनुदानाचा लाभ देण्यात यावा. या बाबीकरीता नाबार्ड कडून याबातच्या निकषात वेळोवेळी जे बदल करण्यात येतील, ते बदल या योजनेकरीता लागू राहतील. या घटकाचा लाभ घेतल्यास त्या लाभार्थ्यास इनवेल बोअरिंग लाभ देय असणार नाही.

७. **इनवेल बोअरिंग :-**

या बाबीचा लाभ १०० टक्के अनुदानावर नाबार्डने निर्धारित केलेल्या खर्चाच्या प्रमाणकाप्रमाणे ₹२०,०००/- देय राहील. इनवेल बोअरींगचे काम करताना खर्चाचे अंदाजपत्रक तयार करुन त्यास उप अभियंत्यांची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. कृषि अधिकारी (विघयो) यांनी झालेल्या कामाची मोजमापे घेऊन अनुदानाचा लाभ देण्यात यावा.

नाबार्डचे प्रचलित या बाबीकरिता खर्चाची प्रमाणके ₹ २००/- प्रतिमिटर व ₹५००/- दोन मीटर केसींग पाईप करीता आहेत. नाबार्डकडून याबाबतच्या निकषामध्ये वेळोवेळी करण्यात येणाऱ्या सुधारणा या योजनेकरीता लागू राहतील. इनवेल बोअरिंग कोणत्या पध्दतीने घ्यावे, याबाबतचा निर्णय जिल्हास्तरावर घेण्यात यावा. लाभार्थीची जुनी विहीर किंवा इनवेल बोअरिंग या बाबीपैकी त्यांच्या मागणीनुसार एकाच बाबीचा लाभ देण्यात येईल.

८. **पाईप लाईन:-**

या बाबी अंतर्गत लाभार्थीस जास्तीत जास्त ३०० मीटर पर्यत लाभ घेता येईल. यासाठी नाबार्डने निर्धारित केलेल्या खर्चाच्या प्रमाणकाच्या १०० टक्के अनुदान देय असून, या करिता ₹२०,०००/-अनुदान उपलब्ध राहील. **शेतकऱ्यांना योग्य गुणवत्तेचे पाईप उपलब्ध व्हावेत म्हणून आयएसआय मार्क असलेल्या पाईपचीच खरेदी करण्यात येईल. सदर पाईप्सचे पूरवठापूर्व व पुरवठापश्चात तपासणी शासनाने निर्धारित केलेल्या संस्थाकडून करण्यात यावी व त्यांचा अहवाल संकलित करून ठेवावा**

९. **पंपसंच:-**

विद्युत पंपसंच तसेच डिझेल ऑईल इंजिनाकरिता रक्कम ₹२०,०००/- पर्यत अनुदान उपलब्ध राहील. सदर निकषाप्रमाणे १०० टक्के अनुदान देय राहील. या अंतर्गत विद्युत पंपसंच त्याचप्रमाणे डिझेल ऑईल इंजिन यांचा लाभ घेता येईल. ज्या शेतकऱ्यांकडे विहिर उपलब्ध आहे, अशा शेतकऱ्यांनाच पंपसंच या घटकाचा लाभ देण्यात यावा. **तथापि, जे शेतकरी ओढा, नदी, नाला इ. सार्वजनिक स्रोत असलेल्या पाण्याचा सिंचनासाठी वापर करू इच्छित आहेत, त्यांच्याकडे संबंधित जिल्ह्यातील उपकार्यकारी अभियंता, पाटबंधारे विभाग यांच्याकडून पाणी उपसा करण्यासाठीचा परवाना उपलब्ध करून घेणे आवश्यक राहिल. अशा लाभार्थ्यांना पंपसंच या घटकाचा लाभ देण्यापूर्वी, त्या लाभार्थ्याकडे सदर परवाना उपलब्ध आहे, याची खातरजमा करून, अशा लाभार्थ्यांना कृषी विकास अधिकारी यांनी फक्त डिझेलपंपाचेच वाटप करावे.**

१०. <u>नवीन विहीर:-</u>

या घटकासाठी लाभार्थीस ₹७००००/- ते ₹ १,००,०००/- अनुदान देय राहील. तसेच शासन पत्र क्र.- १००२/प्र.क्र.७३/ भाग-१ / २१ अे, दिनांक १३ मार्च, २००३ अन्वये या योजनेअंतर्गत किमान अट ०.४० हेक्टर निश्चित करण्यात आली आहे, त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

या योजनेअंतर्गत जे लाभार्थी नवीन विहीर या घटकाचा लाभ घेणार आहेत, त्यांच्यासाठी या योजनेअंतर्गत अनुदानाची कमाल मर्यादा ₹ १,००,०००/- इतकी राहील व '**नवीन विहीर**' या घटकाचा लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यास अन्य कोणत्याही घटकाचा लाभ देय असणार नाही. **ज्या लाभार्थ्याला नवीन विहीर घटकाचा लाभ देण्यात आला आहे, त्याला या घटकाचा लाभ पुन्हा कधीही घेता येणार नाही.**

११. **शेततळे:-**

मृद व जलसंधारण विभागाच्या निकषानुसार रोजगार हमी योजनेच्या मापदंडानुसार रूपये ₹ ३५,०००/- पर्यत १०० टक्के अनुदान देय राहील.

१२. **परसबाग:-**

शेतकऱ्यांना परसबागेसाठी प्रति लाभार्थी ₹२००/- प्रमाणे अनुदान देय राहील. यामध्ये भाजीपाल्याची पिके उदा. टोमॅटो, कांदा, वांगी, भेंडी इत्यादी समावेश राहील.

१३. <u>तुषार / ठिबक:-</u>

या योजनेअंतर्गत तुषार ठिबक सिंचन संच या घटकासाठी रु. २५,०००/- प्रती हेक्टर च्या मर्यादेत १०० टक्के अनुदान देय राहील.

१४. ताडपत्री <u>पुरवठा:-</u>

**अनुसूचित** जाती / नवबौध्द शेतकऱ्यांना धान्य वाळविणेसाठी व पावसापासून धान्याच्या संरक्षणासाठी ताडपत्री पुरवठा अनुदानावर ₹ १०,०००/- च्या मर्यादेपर्यत करण्यात येईल.

**अनुदानाची द्विरुक्ती:-**

उपरोक्त योजनेअंतर्गत १४ बाबींसाठी अनुदान देण्यात येत आहे. तसेच इतर योजनेमधूनही या बाबींसाठी अनुदान देण्याची तरतुद आहे. तेव्हा लाभार्थीस एकच बाब / घटकासाठी दोन योजनेमधून अनुदान मिळणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. या योजनेतील "**नविन विहीर**" या घटकाचा लाभ घेतल्यानंतर पुढे त्याला या योजनेतून नवीन विहीर घटकाचा लाभ कधीही घेता येणार नाही. परंतु "**बैलजोडी**" घटकाचा लाभ घेतल्यानंतर पुढे त्याला किमान पाच वर्षापर्यत बैलजोडी घटकाचा लाभ घेता येणार नाही. **जे लाभार्थी नविन विहीर या घटकाचा लाभ घेणार नाहीत, त्यांना उर्वरित घटकांपैकी ₹. ५०,०००/- च्या मर्यादेत इतर घटकांचा लाभ घेता येईल.**

****************************************

## शासन निर्णय क्र. विघयो - १५१५/प्र. क्र. ११५/४ अे, दि. २३ जून, २०१५ चे परिशिष्ट (चार )
## अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत अनुसूचित जाती/ नवबौध्द शेतकऱ्यांना कृषि विकासासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना

(एक) **योजनेचे उद्दिष्ट**

अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांचे उत्पादन वाढवून त्यांची आर्थिक उन्नती करणे.

(दोन) **लाभार्थी निवडीचे निकष**

**या** योजनेमध्ये अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांची निवड करताना खालील निकष राहतील.

१. जमीन **धारणा** :-

**ज्या** शेतकऱ्यांजवळ त्यांच्या स्वत:च्या नावे ६ हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी शेतजमीन आहे, अशा शेतकऱ्यांची निवड करावी. जमीन धारणेचा दाखला ७/१२ व ८-अ मध्ये घेण्यात यावा.

२. जातीबाबतचा **दाखला** :-

**लाभार्थी** हा अनुसूचित जाती/ नवबौध्द शेतकरी असला पाहिजे. दारिद्रय रेषेखालील (बीपीएल) यादीमध्ये ज्या अनुसूचित जातीच्या / नवबौध्द व्यक्तीचे नाव असेल, त्याला ग्रामसेवक /तलाठी/ गटविकास अधिकारी यांच्या सहीचे कागदपत्र ग्राहय धरले जातील. याच धर्तीवर अनुसूचित जाती उप योजनेंतर्गत दारिद्रय रेषेखालील अनुसूचित जातीच्या व्यक्तीसाठी ज्या योजना असतील त्या योजनेकरिता समाजकल्याण विभागातील दिनांक ७ जानेवारी, १९९७ च्या परिपत्रकातील सूचनेप्रमाणे पुन्हा तहसिलदार यांच्या सहीचा जातीचा दाखला आणणे आवश्यक राहणार नाही. **दारिद्रय रेषेखालील (बीपीएल) यादीमध्ये शेतकऱ्याचे नाव नसेल, तर लाभार्थ्यांच्या संबंधी प्रस्तुत योजनेंतर्गत लाभार्थी शेतकऱ्याच्या निवडीच्या सविस्तर सूचना खालील प्रमाणे आहेत.**

३. उत्पन्नाचा **दाखला** :-

दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांसाठी वार्षिक उत्पन्नाचे मर्यादेची अट राहणार नाही. मात्र दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांशिवाय अन्य अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांच्या बाबतीत ज्या शेतकऱ्यांची जमीन धारणा ६ हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी आहे आणि ज्यांचे सर्वमार्गांनी मिळणारे वार्षिक उत्पन्न ₹५०,०००/- पर्यंत आहे. अशा शेतकऱ्यांना तहसिलदार यांचेकडून उत्पन्नाचा दाखला देणे बंधनकारक राहिल.

४. लाभार्थींची **निवड खालील प्राधान्य क्रमाने करणे अनिर्वाय राहिल** :-

४.१ सहा हेक्टर पर्यंत जमीनधारणा असणाऱ्या उत्सुक दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांची प्रथम प्राधान्याने निवड करावी.

४.२ त्यानंतर दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांशिवाय अन्य अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांची ज्यांची जमीन धारणा सहा हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी आहे, अशा उत्सुक शेतकऱ्यांची खालील प्राधान्य क्रमाने निवड करावी.

१) २ हेक्टर पर्यंत क्षेत्र असलेल्या शेतकऱ्यांना प्रथम प्राधान्य देण्यात यावे.

२) २.०० हेक्टर ते ४.०० हेक्टर क्षेत्र असलेल्या शेतकऱ्यांना द्वितीय प्राधान्य,

३) ४.०० हेक्टर ते ६.०० हेक्टर क्षेत्र असलेल्या शेतकऱ्यांना तृतिय प्राधान्य

**(तीन ) योजनेच्या अंमलबजावणीचा कालावधी :-**

या योजनेंतर्गत निवड करण्यात येणाऱ्या प्रत्येक लाभार्थीसाठी योजना राबविण्याचा कालावधी दोन वर्षाचा राहिल. म्हणजेच लाभार्थीची निवड झालेले वर्षे व त्याच्या पुढील वर्ष अशा दोन वर्षाच्या कालावधीत लाभ देण्यात यावा. त्यानुसार, सन २०१४-१५ मधील अपूर्ण लाभ मिळालेल्या लाभार्थ्यांना प्रथमत: पूर्ण लाभ देवून उर्वरित अनुदानातून सन २०१५-१६ मध्ये निवडलेल्या लाभार्थ्यांना लाभ देण्यात यावा. तथापि, सदर अनुदानातून सन २०१४-१५ पूर्वीच्या अपूर्ण कामांना अनुदान देण्यात येऊ नये.

**(चार) खर्चाचे निकष :-**

उपरोक्त योजनेअंतर्गत विहित बाबीवर करावयाच्या खर्चाचे निकष व त्याखालील मार्गदर्शक सूचना परिशिष्ट (एक) मध्ये देण्यात आलेल्या आहेत.

**(पाच) प्रकल्प तयार करणे**

**उपरोक्त** योजनेंतर्गत लाभार्थीची निवड करण्यासाठी तालुक्यातील गटविकास अधिकाऱ्यांने कृषि अधिकारी (विघयो) यांच्या मार्फत केलेल्या नमुन्यात पात्र लाभार्थीकडून अर्ज मागवून घ्यावेत. अशाप्रकारे तयार केलेली यादी गटविकास अधिकाऱ्यांने जिल्हा निवड समितीला सादर करावी.

**(सहा) जिल्हा निवड समिती :-**

**या** योजनेंतर्गत गटविकास अधिकाऱ्यांनी तयार केलेल्या यादीमधून लाभार्थीची निवड करण्यासाठी जिल्हास्तरावर एक जिल्हा समिती असेल या समितीचे गठन पुढील प्रमाणे असेल.

| | | |
|---|---|---|
| १ | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २ | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ३ | कार्यकारी अभियंता, लघुसिंचन, जिल्हा परिषद | सदस्य |
| ४ | भूजल सर्वेक्षण यंत्रणेचे जिल्हास्तरीय अधिकारी | सदस्य |
| ५ | जिल्हा समाजकल्याण अधिकारी | सदस्य |
| ६ | विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी जिल्हा परिषद | सदस्य |
| ७ | कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य सचिव |

**(सात ) लाभार्थीची निवड रद्द करणे :-**

**लाभार्थीच्या** निवडीचे अधिकार परिच्छेद (सहा) मध्ये नमूद केलेल्या समितीला राहतील, तसेच खालील कारणांमुळे काही लाभार्थींची निवड रद्द करावयाची झाल्यास त्याचे ही अधिकार वरील जिल्हा स्तरीय समितीस राहतील.

१) निवड केलेला शेतकरी मयत झाल्यास.
२) निवड झालेला शेतकऱ्यांने आपली सर्व शेतजमीन विकून, तो भूमीहीन झाला असल्यास.
३) निवड झालेला शेतकरी गाव सोडून, इतरत्र कायम राहण्यास गेला असल्यास.
४) निवड झालेला शेतकरी, शेती विकास योजना हाती घेण्यास उत्सुक नसल्यास.
५) निवड झालेल्या शेतकऱ्यांने अर्थसहाय्य घेण्यास नकार दिल्यास.
६) निवड झालेला शेतकरी, योजनेखाली घेतलेल्या अनुदानाचा गैरवापर करत असल्यास
७) लाभार्थींची निवड, शासनाने विहित केलेल्या निकषानुसार झाली नसल्याचे आढळून आल्यास

वरील परिस्थितीमुळे लाभार्थ्यांची निवड रद्द झाल्यास नव्याने लाभधारकांची निवड करताना खालील मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करावी:-

(१) मयत झालेल्या लाभधारकाऐवजी शक्यतो वारसांची निवड करावी व शिल्लक राहिलेले अर्थसहाय्य त्यांना देण्यात यावे.

(२) लाभार्थींनी विक्री केलेल्या जमिनीवर अर्थसहाय्य दिले गेले असल्यास व जमिन विकत घेणारी व्यक्ती जर योजनेमध्ये निवडीस पात्र असेल अशा लाभार्थ्यांची निवड करुन उर्वरित अर्थसहाय्याचा लाभ त्यास देण्यात यावा.

वरील कारणामुळे लाभार्थ्यांची निवड रद्द करुन त्याऐवजी विहित केलेल्या अटींची पूर्तता करणाऱ्या दुसऱ्या पात्र लाभार्थ्यांची विहित पध्दतीने निवड करावी.

**(आठ) अनुदानाचा गैरवापर करण्यास प्रतिबंध :-**

१) या योजनेत निवड झालेल्या शेतक-यांनी अनुदानाचा गैरवापर केल्याचे आढळून आल्यास, अशा लाभार्थींकडून अनुदानाची वसुली करण्यात येवू नये, मात्र अशा लाभार्थींचे नाव काळया यादीत घालून सर्व संबंधीत इतर विभागांना ही यादी पाठविण्यात यावी व त्यांना या योजनेत कोणत्याही प्रकारचा लाभ देवू नये या बाबत दक्षता घेण्यात यावी. या योजनेंतर्गत निवड झालेला शेतकरी अर्थसहाय्याचा दुरुपयोग करणार नाही यासाठी योजना राबविणाऱ्या अधिकाऱ्यांनी वेळोवेळी भेटी देवून तपासणी करावी व दिलेल्या प्रत्येक भेटीची नोंद त्यांच्या दौऱ्यांच्या दैंनदिनीत ठेवावी.

२) लाभार्थींची निवड शासनाने विहित केलेल्या निकषानुसार झाली नसल्याचे आढळून आल्यास अशा चुकीच्या निवडीबाबत तसेच लाभधारकाला देण्यात येणाऱ्या अनुदानाच्या रक्कमांबाबत काही गैरव्यवहार आढळून आल्यास त्याची जबाबदारी निश्चित करुन संबंधित अधिकाऱ्यांकडून लाभार्थ्यांना दिलेल्या अर्थसहाय्याची वसूली करण्यात येईल.

**(नऊ) अनुदानाचे स्वरुप / पध्दती :-** या योजने अंतर्गत निवड केलेल्या लाभार्थ्यांना देय अनुदानाची रक्कम रोख स्वरुपात न देता वस्तु रुपामध्ये (योजनेतील मंजुर घटक) द्यावयाची आहे व जेथे आवश्यक असेल अशा लाभार्थीचे बँकेत खाते उघडून अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांच्या खात्यात जमा करण्यात यावी.

या योजनेमध्ये १४ बाबींवर अर्थसहाय्य देण्यात येत असले तरी या सर्वच बाबींचा लाभ लाभार्थ्यांस आवश्यक आहे असे अभिप्रेत नाही. मात्र कोणत्या बाबींची लाभार्थ्यांस निकड आहे हे लाभार्थ्यास विचारुन /निश्चित करुन त्याप्रमाणे लाभ देण्यात यावा. या योजनेंतर्गत जे लाभार्थी नविन **विहिर** या घटकाचा लाभ घेणार आहेत, त्यांच्यासाठी अनुदानाची मर्यादा ₹ ७०,००० ते ₹ १,००,०००/- इतकी राहील (भुजल सर्वेक्षणाच्या नुसार विविध जिल्हयासाठी ठरविण्यात आलेल्या भुस्तरीय खर्चाच्या मापदंडाच्या अधिन राहून देय राहील)

परंतु **जे लाभार्थी नविन विहिर या घटकाचा लाभ घेणार नाहीत, त्यांना अनुदानाची मर्यादा ₹ ५०,०००/- इतकी राहील व ते योजनेतील "नविन विहीर" घटक सोडून योजनेतील उर्वरित घटकांपैकी ₹ ५०,०००/- च्या मर्यादेत इतर घटकांचा लाभ घेऊ शकतील.**

**(दहा) लेखा पध्दती :-**

**लाभार्थ्यांना** देण्यात येणाऱ्या बाबवार अर्थसहाय्याची, योजनानिहाय, बाबनिहाय व लाभार्थीनिहाय नोंद करण्याकरिता पंचायत समिती स्तरावर रजिस्टर ठेवण्यात यावे व त्यामध्ये लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या अनुदानाची बाबनिहाय नोंद ठेवण्यात यावी. तसेच कृषि विकास अधिकारी जिल्हा परिषद स्तरावर लाभार्थ्यांना देय व देण्यात आलेल्या लाभ घटकांची नोंद नोंदवहीत ठेवणे अत्यावश्यक आहे. या नोंदवहीची तपासणी जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) यांनी सांक्षांकित करणे आवश्यक राहील. पंचायत समिती स्तरावरील नोंदवहया व अभिलेख जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) यांनी तपासून तशी नोंद नोंदवहीमध्ये घेण्यात यावी. कृषि विकास अधिकारी यांनीही पंचायत समिती स्तरावरील व जिल्हा परिषद स्तरावरील दर नोंदवहीची तपासणी करणे आवश्यक राहील. सदर नोंदवहया व अभिलेख विभागीय कृषि सह संचालक, कृषि आयुक्तालय स्तरावरील अधिकाऱ्यांना त्यांच्या दौऱ्यांच्या वेळी तपासण्यासाठी उपलब्ध करुन द्याव्यात. लाभार्थ्यांना दिलेल्या अर्थसहाय्याची लाभार्थी स्तरावर नोंद ठेवण्यासाठी लाभार्थ्यांना नोंद पुस्तिका देण्यात यावी. या नोंद पुस्तिकेत दिलेल्या अर्थसहाय्याची नोंद संबंधीत अधिकाऱ्यांनी वेळोवेळी न चुकता करावी.

**(अकरा) खर्चाचे नियोजन :-**

प्रत्येक लाभार्थीची आर्थिक स्थिती, त्यांची एकूण जमीन व इतर साधनांची उपलब्धता विचारात घेवून त्या लाभार्थ्यास कोणकोणत्या बाबींवर अर्थसहाय्य द्यावयाचे आहे, याबाबतचा प्रारुप आराखडा लाभार्थी बरोबर चर्चा करुन तयार करावा. अशा प्रकारचा आराखडा तालुका स्तरावर कृषि अधिकारी (विघयो) व जिल्हास्तरावर संबंधीत जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) यांनी तयार करावा व त्याप्रमाणे दोन वित्तीय वर्षात बाबवार खर्चाचे नियोजन करण्यात यावे. **लाभार्थ्यांना देय असलेला संपुर्ण लाभ दोन**

**वर्षात दिला जाईल, याची पंचायत समितीस्तरावर व जिल्हा परिषदस्तरावर कटाक्षाने दक्षता घेण्यात यावी व त्याचे व्यवस्थित नियोजन करण्यात यावे. कोणत्याही परिस्थितीत कामे अपूर्ण राहणार नाहीत याची दक्षता घेण्यात यावी.**

**(बारा) मासिक प्रगती अहवाल :-**

योजनेचा मासिक प्रगती अहवाल विहित केलेल्या प्रपत्रात प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत कृषि आयुक्तालयाकडे पाठविण्यात यावा व कृषि आयुक्तालयाने एकत्रित अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास सादर करावा.

**(तेरा) प्रसिध्दी :-** या योजनेची माहिती योजनेअंतर्गत लाभ घेऊ इच्छिणाऱ्या संबंधित लोकांना व्हावी या दृष्टीने कृषि आयुक्तालयातील कृषि माहिती विभाग, विभागीय कृषि सह संचालक तसेच जिल्हा परिषद स्तरावर कृषि विकास अधिकारी यांनी या योजनेस जास्तीत जास्त प्रसिध्दी द्यावी. त्यासाठी त्यांनी त्यांच्या क्षेत्रातील स्वयंसेवी संस्थाशी संपर्क साधून त्यांच्यामार्फत देखील प्रसिध्दी द्यावी. या योजनेची माहिती जिल्हास्तरावर जिल्हा परिषदेतील जिल्हा कृषि अधिकारी (विघयो), तसेच पंचायत समितीस्तरावर गट विकास अधिकारी, कृषि अधिकारी (विघयो) यांच्याकडे उपलब्ध राहील.

---------------------------------------*************______________________